**सन २०२५-२६ साठी राष्ट्रीय अन्न सुरक्षा आणि पोषण अभियान- अन्नधान्य व वाणिज्यिक पिके करिता तिन्ही प्रवर्गासाठी (सर्वसाधारण, अनु.जाती, अनु.जमाती ) पहिल्या हप्त्याचा (केंद्र व राज्य हिस्सा) एकूण रु. १५६९०.३५००० लाख निधीस वित्तीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : राखातेअ-२०२५/प्र.क्र.५७/४अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २ जून, २०२५

**संदर्भ:-**

१. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.३१/१७-अे, दि.१९/०४/२०१७.
२. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. संकीर्ण-०९१९/प्र.क्र.२२१/१४-अे, दि.०४/११/२०२०.
३. कृषी व पदुम विभाग, शासन पत्र No. CSS-२०२५/C.R.१४/२-A, दि. २६/३/२०२५.
४. केंद्र शासनाचे पत्र क्र.०३/१३/२०२५-KY, दि.१६/४/२०२५.
५. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.राखातेअ-२०२५/प्र.क्र.५७/४-अे, दि.०६/०५/२०२५.
६. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३,दि.०७/०४/२०२५.
७. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन परिपत्रक क्र.बीयुडी-२०२५/प्र.क्र.५८/अर्थ (विघयो), दि.१५/४/२०२५.
८. आदिवासी विकास विभाग शासन परिपत्रक क्र.बीयुडी-२०२५/प्र.क्र.०२/कार्यासन-६, दि.२१/०४/२०२५
९. केंद्र शासनाचे पत्र क्र.११२ (MH१०), दि.१९/०५/२०२५.
१०. केंद्र शासनाचे पत्र क्र.०३/०१/२०२४, दि.१९/०५/२०२५.
११. कृषि आयुक्तालयाचे पत्र जा.क्र.कृआ/राअसुपोअ/निधी वितरण-२५-२६/ प्र.क्र.०७/१२०३७/ २०२५, दि.२८/०५/२०२५.

**प्रस्तावना :-**

सन २०२५-२६ साठी राष्ट्रीय अन्न सुरक्षा आणि पोषण अभियान-अन्नधान्य पिके व वाणिज्यिक पिके कार्यक्रमासाठी रु. ३२१८०.१८ लाख (सन २०२४-२५ चे प्रलंबित दायित्वासह) रकमेच्या वार्षिक कृती आराखडयास राज्यस्तरीय मंजुरी समितीने (SLSC) संदर्भ क्र.३, दि. २६ मार्च, २०२५ रोजीच्या शासन पत्रान्वये मंजूरी दिली आहे.

तदनंतर, केंद्र शासनाने त्यांच्या संदर्भ क्र.४ दि.१६ एप्रिल ,२०२५ च्या पत्रान्वये सन २०२५-२६ साठीच्या वार्षिक कृती आराखड्यामध्ये अंतिम मंजुरी देताना काही बाबी नामंजूर केल्यामुळे रु.२९६५०.५७ लाख (प्रलंबित दायित्व वगळून) रकमेचा कार्यक्रम कमी होऊन रु.२९३८५.६४ लाख (प्रलंबित दायित्व वगळून) रकमेचा सुधारित कार्यक्रम झाला आहे. सदर सुधारित कार्यक्रमानुसार रु.३१३८०.६८५ लाखाच्या वार्षिक कृती आराखडयास (प्रलंबित दायित्वासह) संदर्भ क्र.५ दि.०६/०५/२०२५ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान केली आहे.

सन २०२५-२६ साठी राष्ट्रीय अन्न सुरक्षा आणि पोषण अभियान अंतर्गत केंद्र शासनाने तिन्ही प्रवर्गाकरिता (सर्वसाधारण, अनु.जाती, अनु.जमाती) पहिल्या हप्त्यापोटी, केंद्र हिश्श्याचा एकूण रु. ९४१४.२१०० लाख निधी संदर्भ क्र.९, दि.१९/०५/२०२५ अन्वये वितरीत केलेला आहे. त्याअनुषंगाने कृषि आयुक्तालयाच्या मागणीप्रमाणे, तिन्ही प्रवर्गाकरिता राष्ट्रीय अन्न सुरक्षा आणि पोषण अभियान अन्नधान्य पिके व वाणिज्यिक पिके अंतर्गत प्राप्त झालेला, केंद्र हिश्श्याचा रु.९४१४.२१०० लाख व त्यास समरुप राज्य हिश्श्याचा रु.६२७६.१४००० लाख असा एकूण रु.१५६९०.३५००० लाख निधीस, वित्तीय मान्यता प्रदान करण्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:**

सन २०२५-२६ साठी राष्ट्रीय अन्न सुरक्षा आणि पोषण अभियान अन्नधान्य पिके व वाणिज्यिक पिके करिता तिन्ही प्रवर्गासाठी एकूण रु.१५६९०.३५००० लाख (एकशे छप्पन कोटी, नव्वद लाख, पस्तीस हजार फक्त) (प्रलंबित दायित्वासह) निधीस वित्तीय मान्यता देवून, या शासन निर्णयान्वये आयुक्त (कृषी) पुणे, यांना सदर निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे. **तसेच, केंद्र शासनाच्या दि.१९/०५/२०२५ च्या पत्रात नमूद केल्यानुसार सदर निधीमधून सन २०२४-२५ मधील संपूर्ण (रु.१९९५.०४७ लाख ) प्रलंबित दायित्वाची प्राथम्याने अदायगी करावी.**

२. सदर निधीपैकी केंद्र व राज्य हिश्श्याच्या वितरीत निधीचे विवरण पुढीलप्रमाणे :-

**(रू.लाखात)**

| **अ.क्र.** | **योजनेचे नाव** | **केंद्र हिस्सा (६० टक्के)** | **राज्य हिस्सा (४० टक्के)** | **एकूण** |
|---|---|---|---|---|
| १ | MH-10<br>राष्ट्रीय अन्न सुरक्षा आणि पोषण अभियान- अन्नधान्य पिके व वाणिज्यिक पिके | ९४१४.२१०० | ६२७६.१४००० | १५६९०.३५००० |

३. राष्ट्रीय अन्न सुरक्षा आणि पोषण अभियान अंतर्गत, अन्नधान्य पिके व वाणिज्यिक पिकांकरिता तिन्ही प्रवर्गाचा (सर्वसाधारण, अनु.जाती, अनु.जमाती) केंद्र व राज्य हिश्श्याचे प्रवर्गनिहाय व पीकनिहाय निधी वितरण **प्रपत्र -१** मध्ये दर्शविण्यात आले आहे.

४. सदर अभियानातंर्गत उपलब्ध करुन देण्यात आलेला केंद्र हिश्श्याचा रु.९४१४.२१०० लाख ( चौऱ्याण्णव कोटी, चौदा लाख , एकवीस हजार फक्त) व राज्य हिश्श्याचा रु. ६२७६.१४०००लाख (बासष्ट कोटी, शहात्तर लाख, चौदा हजार फक्त) निधी खालील लेखाशिर्षांतर्गत सन २०२५-२६ करिता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतुदीतून SNA-SPARSH खात्यातून खर्ची टाकावा.

| प्रवर्ग | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा |
|---|---|---|
| **सर्वसाधारण** | मागणी क्रमांक डी-३<br>२४०१- पीक संवर्धन<br>(००) (१०२) अन्नधान्य पिके<br>(००) (२५) कृषि उन्नती योजना- राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-अन्नधान्य पिके (केंद्र हिस्सा ६०%) (२४०१ ४६१४) (योजनांतर्गत) (दत्तमत) ३३, अर्थसहाय्य | मागणी क्रमांक डी-३<br>२४०१- पीक संवर्धन<br>(००) (१०२) अन्नधान्य पिके<br>(००) (३३) कृषि उन्नती योजना- राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-अन्नधान्य पिके (राज्य हिस्सा ४०%) (२४०१ A२३४) (योजनांतर्गत) (दत्तमत) ३३, अर्थसहाय्य |
| **अनुसूचित जाती** | मागणी क्रमांक एन-३<br>२४०१- पीक संवर्धन<br>(००)(७८९) अनुसूचीत जाती उपयोजना<br>(००) (०५) कृषि उन्नती योजना- राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-अन्नधान्य पिके (केंद्र हिस्सा ६०%) अनुसूचित जाती उपयोजना (२४०१ B१०५),<br>३३, अर्थसहाय्य | मागणी क्रमांक एन-३<br>२४०१- पीक संवर्धन<br>(००)(७८९)अनुसूचीत जाती उपयोजना<br>(००)(०६) कृषि उन्नती योजना- राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-अन्नधान्य पिके (राज्य हिस्सा ४०%) अनुसूचित जाती उपयोजना (२४०१ B११४),<br>३३, अर्थसहाय्य |
| **अनुसूचित जमाती** | मागणी क्रमांक टी-५<br>२४०१- पीक संवर्धन,<br>७९६-जनजाती क्षेत्रांतर्गत उपयोजना (पंचवार्षिक योजनांतर्गत योजना),<br>जनजाती क्षेत्राअंतर्गत उपयोजना,<br>(०१) (२१) कृषि उन्नती योजना- राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-अन्नधान्य पिके (केंद्र हिस्सा ६०%) (२४०१ A५५७)<br>३३, अर्थसहाय्य | मागणी क्रमांक टी-५<br>२४०१- पीक संवर्धन,<br>७९६-जनजाती क्षेत्रांतर्गत उपयोजना (पंचवार्षिक योजनांतर्गत योजना),<br>जनजाती क्षेत्राअंतर्गत उपयोजना,<br>(०१)(२२) कृषि उन्नती योजना- राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-अन्नधान्य पिके (राज्य हिस्सा ४०%) (२४०१ A५६६)<br>३३, अर्थसहाय्य |

५. सन २०२५-२६ मध्ये राज्यात सदर अभियानाची अमंलबजावणी व सनियंत्रण करण्याच्या दृष्टीने निधी आहरण व वितरण करणेसाठी, पुढीलप्रमाणे नियंत्रण तसेच, आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहेत.

| **स्तर** | **नियंत्रण अधिकारी** | **आहरण व संवितरण आधिकारी** |
|---|---|---|
| आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि), कृषी आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१) कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे. |

६. केंद्र शासनाने सदर अभियानातंर्गत विहित केल्याप्रमाणे अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व महिला शेतकरी लाभार्थ्यांना सदर योजनेंतर्गत लाभ देण्यात यावा.

७. सदर अभियानाच्या विविध घटकांतर्गत लाभार्थी शेतकरी निवडतेवेळी अल्प व अत्यल्प भूधारक शेतकऱ्यांना वा सदर शेतकऱ्यांच्या गटांना प्राधान्य देण्यात यावे. तसेच, शेतकऱ्यांचे अर्ज मागवून पारदर्शक पद्धतीने लाभार्थ्यांची निवड करावी.

८. या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीचा तात्काळ विनियोग करण्यात यावा. तसेच, निधी विनियोगाच्या अनुषंगाने संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी वेळोवेळी उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

९. हा शासन निर्णय, वित्त विभागाचे, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.०७/०४/२०२५, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन परिपत्रक क्र.बीयुडी-२०२५/ प्र.क्र.५८/ अर्थ(विघयो), दि.१५/०४/२०२५ व आदिवासी विकास विभाग शासन परिपत्रक क्र.बीयुडी-२०२५/ प्र.क्र.०२/कार्यासन-६, दि.२१/०४/२०२५ नुसार विहीत केलेल्या अटींची पूर्तता होत असल्याने, तसेच, सदर परिपत्रकानुसार या विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. केंद्रीय कृषी मंत्रालयाने राष्ट्रीय अन्न सुरक्षा आणि पोषण अभियान अंतर्गत राज्य शासनास सन २०२५-२६ करिता संदर्भांकित दि.१६/०४/२०२५ व दि.१९/०५/२०२५ रोजीच्या पत्रान्वये दिलेल्या मान्यतेनुसार, तसेच चालू वर्षी अभियानाकरिता मंजूर केलेल्या कृती आराखड्यानुसार आणि वेळोवेळी केंद्रीय मंत्रालयाने दिलेल्या दिशा निर्देशानुसार सदर अभियानाची अंमलबजावणी करणे बंधनकारक राहील, याबाबत संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी राज्यस्तरावरून अभियानाचे सनियंत्रण करावे, त्याप्रमाणे अभियानाची प्रभावी अंमलबजावणी व संनियंत्रणाकरिता वेळोवेळी अधिनस्त कार्यालयांना निर्देशित करावे.

११. या अभियानांतर्गत विविध निविष्ठांच्या खरेदीसाठी (खते, औषधे, बियाणे, सिंचन साधने, यंत्र/औजारे इ.) शासनाच्या प्रचलित धोरणानुसार थेट लाभार्थ्यांच्या बँक खाती अनुदान जमा करण्यात (Direct Benefit Transfer) यावे. सदर निविष्ठांची खुल्या बाजारातून खरेदी करण्याचे स्वातंत्र्य लाभार्थ्याला राहील. तथापि, या अभियानांतर्गत शासकीय संस्थांनी/ शासनाच्या सार्वजनिक उपक्रमांनी उत्पादित केलेल्या निविष्ठाचा पुरवठा करण्यात येत असल्यास संदर्भाकीत शासन निर्णय दि.१९/०४/२०१७ नुसार कार्यवाही करावी.

१२. कृषि विभागाच्या योजनांची महा-डीबीटी पोर्टलद्वारे अंमलबजावणी करण्याबाबत संदर्भाधीन शासन परिपत्रक दि.०४/११/२०२० नुसार कृषि यांत्रिकीकरण, सिंचन साधने व सुविधा, प्रमाणित बियाणे वितरण व पीक प्रात्यक्षिके याबाबींची अंमलबजावणी करावी.

१३. संबंधित जिल्हा अधीक्षक कृषि अधिकाऱ्यांनी/तालुका कृषि अधिकाऱ्यांनी अभियानाकरीता लाभार्थ्यांची निवड करून अभियानांतर्गत समाविष्ट कार्यक्रम राबविण्याच्या दृष्टीने लाभार्थ्यांची यादी तालुका स्तरावर संकलित करावी. सदर यादीमध्ये शेतकऱ्यांचे नांव, गांव, सर्वे/गट क्रमांक या बाबींसह मोबाईल/दूरध्वनी क्रमांक बँक खाते क्रमांक, आधार क्रमांक इ. बाबतच्या माहितीचा अंतर्भाव असावा. त्याचप्रमाणे अभियानांतर्गत निवडण्यात आलेल्या लाभार्थ्यांची यादी निधी प्राप्त झाल्यापासून १५ दिवसांमध्ये कृषि विभागाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्याची जबाबदारी संबंधित जिल्हा अधीक्षक कृषि अधिकाऱ्यांची राहील.

१४. सदर लाभार्थांच्या यादीनुसार सर्व लाभार्थी शेतकऱ्यांच्या शेतावर हाती घेण्यात आलेल्या कार्यक्रमाची प्रत्यक्ष तपासणी त्या-त्या गावातील कृषि सहाय्यकांनी करावयाची असून, त्यांनी आपला अहवाल तालुका कृषि अधिकाऱ्यांमार्फत जिल्हा अधीक्षक कृषि अधिकाऱ्यांना सादर करावयाचा आहे. त्याचप्रमाणे, कृषि सहाय्यकांचे अहवाल प्राप्त होताच सदर कार्यक्रमांतर्गत राबविण्यात आलेल्या कामांच्या पर्यवेक्षीय तपासणीचे उचित प्रमाण संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी मार्गदर्शक सूचनेमध्ये विहित करावे.

१५. सदर अभियानांतर्गत केंद्र शासनाच्या वेळोवेळी प्राप्त सूचनांचे पालन करणे बंधनकारक असेल.

१६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०६०२१६२५४८०४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

PRATIBHA MADHAV PATIL

Digitally signed by PRATIBHA MADHAV PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=b693d975fffc642fe6b87c2ce9e1297fd1e8bda9b459f85f75f159984ba680fd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DA026E85AE8CBB4E3C2ACDBECBBF2F6D6CB0AE6ED5C1E54483490119EE0456AD, cn=PRATIBHA MADHAV PATIL
Date: 2025.06.02 16:26:34 +05'30'

**( प्रतिभा पाटील )**

**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.सभापती, विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२) मा. अध्यक्ष, विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४) मा.विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

१०) मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
११) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, अकोला.
१२) संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.
१३) सर्व विभागीय कृषि सहसंचालक.
१४) सर्व जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी.
१५) महालेखाकार ( स्थानिक निकाय लेखा परीक्षा व लेखा), मुंबई.
१६) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर.
१७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर.
१८) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
१९) सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे.
२०) वित्त विभाग (कार्या. व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई
२१) निवड नस्ती.

शासन निर्णय क्रमांक : राखातेअ-२०२५/प्र.क्र.५७/४अे

**प्रपत्र - १**

राष्ट्रीय अन्न सुरक्षा आणि पोषण अभियान अंतर्गत, अन्नधान्य पिके व वाणिज्यिक पिकांकरिता तिन्ही प्रवर्गाचे (सर्वसाधारण, अनु.जाती, अनु.जमाती) केंद्र व राज्य हिश्श्याचे प्रवर्गनिहाय व पीकनिहाय निधी वितरणाचा तपशील

| अ. क्र. | पिक | सर्वसाधारण | | | अनु. जाती | | | अनु. जमाती | | | एकुण | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | केंद्र हिस्सा | समरूप राज्य हिस्सा | एकुण | केंद्र हिस्सा | समरूप राज्य हिस्सा | एकुण | केंद्र हिस्सा | समरूप राज्य हिस्सा | एकुण | केंद्र हिस्सा | समरूप राज्य हिस्सा | एकुण |
| लेखाशीर्ष | | २४०१४६१४ | २४०१A२३४ | -- | २४०१B१०५ | २४०१B११४ | -- | २४०१A५५७ | २४०१A५६६ | -- | -- | -- | -- |
| १ | भात | १३७.०५०८६ | ९१.३६७२४ | २२८.४१८१० | १८.७३८६७ | १२.४९२४५ | ३१.२३११२ | १८.५९३९८ | १२.३९५९९ | ३०.९८९९७ | १७४.३८३५१ | ११६.२५५६८ | **२९०.६३९१९** |
| २ | गहू | ५८.५४२७२ | ३९.०२८४८ | ९७.५७१२० | ७.८५८८२ | ५.२३९२१ | १३.०९८०३ | ६.११४८४ | ४.०७६५६ | १०.१९१४० | ७२.५१६३८ | ४८.३४४२५ | **१२०.८६०६३** |
| ३ | कडधान्य | ३३९४.१६१०० | २२६२.७७४०० | ५६५६.९३५०० | ५१३.८१६३३ | ३४२.५४४२२ | ८५६.३६०५५ | ४०३.६१२७३ | २६९.०७५१५ | ६७२.६८७८८ | ४३११.५९००६ | २८७४.३९३३७ | **७१८५.९८३४३** |
| ४ | TRFA - कडधान्य | १२८.६६७५९ | ८५.७७८४० | २१४.४४५९९ | १९.९५९०२ | १३.३०६०१ | ३३.२६५०३ | २६.३०७५२ | १७.५३८३५ | ४३.८४५८७ | १७४.९३४१३ | ११६.६२२७६ | **२९१.५५६८९** |
| ५ | भरडधान्य | २८२.८९२६४ | १८८.५९५०९ | ४७१.४८७७३ | ४४.१८८९० | २९.४५९२८ | ७३.६४८१८ | ३५.०३५१६ | २३.३५६७७ | ५८.३९१९३ | ३६२.११६७० | २४१.४१११४ | **६०३.५२७८४** |
| ६ | पौष्टिक तृणधान्य | ३१७०.३५००७ | २११३.५६६७१ | ५२८३.९१६७८ | ४६९.०९४२१ | ३१२.७२९४७ | ७८१.८२३६८ | ३६१.८१८९२ | २४१.२१२६१ | ६०३.०३१५३ | ४००१.२६३२० | २६६७.५०८७९ | **६६६८.७७१९९** |
| ७ | कापुस | १५२.६५३८३ | १०१.७६९२२ | २५४.४२३०५ | २४.७३८७८ | १६.४९२५२ | ४१.२३१३० | १८.०५८४९ | १२.०३८९९ | ३०.०९७४८ | १९५.४५११० | १३०.३००७३ | **३२५.७५१८३** |
| ८ | ऊस | ९६.९०३०३ | ६४.६०२०२ | १६१.५०५०५ | १४.३६४८९ | ९.५७६५९ | २३.९४१४८ | १०.६८७०० | ७.१२४६७ | १७.८११६७ | १२१.९५४९२ | ८१.३०३२८ | **२०३.२५८२०** |
| **एकुण** | | **७४२१.२२१७४** | **४९४७.४८११६** | **१२३६८.७०२९०** | **१११२.७५९६२** | **७४१.८३९७५** | **१८५४.५९९३७** | **८८०.२२८६४** | **५८६.८१९०९** | **१४६७.०४७७३** | **९४१४.२१०००** | **६२७६.१४०००** | **१५६९०.३५०००** |